**सन २०१८-१९ करिता विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत मंजूर "Gamified Learning Labs In Eklavya Schools (training support & tablets for students; content under CSR)" या योजनेच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकेंस-२०१८ /प्र.क्र. १०९ /का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १०/१०/२०१८

**संदर्भ-**

१. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०५/२०१७-TSP, दि.२१/०६/२०१८
२. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०१(१३)/२०१८-TSP, दि.२९/०६/२०१८ (२ पत्रे)
३. आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रिय-२०१८/प्र.क्र.६९/का.१९, दि.१०.०९.२०१८

**प्रस्तावना -**

सन २०१८-१९ करिता विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत अनुदान ,भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत व अदिम जमाती विकास कार्यक्रम या योजना अंतर्गत प्राप्त होणा-या अनुदानासाठी ईमेल वर प्रस्ताव पाठविण्याबाबत अशासकीय / सामाजिक /खाजगी संस्थांना आदिवासी विकास विभागाकडून आवाहन करण्यात आलेले होते. या अनुषंगाने प्राप्त प्रस्तावामधून निवड केलेल्या प्रस्तावांचे सविस्तर सादरीकरण व छाननी करण्यासाठी दि.२२.०३.२०१८ रोजी सह्याद्री अतिथीगृह येथे प्रस्ताव छाननी साठी तीन पॅनेल तयार करण्यात आले होते. सदर पॅनेल समोर समोर "EduisFun" ने प्रस्तावाचे सविस्तर सादरीकरण केलेले आहे. सदर योजनेद्वारे एकलव्य मॉडेल शाळांमध्ये विविध तंत्रज्ञानाचा वापर करून विद्यार्थ्यामध्ये शिक्षणा संबंधी खेळीमेळीचे, आनंदी, तणावमुक्त वातावरण तयार होउन त्यांची बौद्धिक क्षमता वाढविण्याचा प्रयत्न करणे हा आहे.

२. आदिवासी विकास विभागामार्फत सुरु असलेल्या १४ एकलव्य मॉडेल शाळांमध्ये विविध तंत्र ज्ञानाचा वापर करून बौद्धिक क्षमता व शिक्षणा विषयी आनंदी वातावरण तयार करून देण्याच्या कार्यक्रमार्तंगत "Gamified Learning Labs In Eklavya Schools (training support & tablets for students; content under CSR " ही योजना केंद्र शासनाकडे प्रस्तावित करण्यात आली. जनजाती कार्य मंत्रालयाने दि.२३.०५.२०१८ रोजी आयोजित केलेल्या Project Appraisal Committee (PAC) बैठकीमध्ये "Gamified Learning Labs In Eklavya Schools (training support & tablets for students; content under CSR)" ही योजना सन २०१८ -१९ करिता विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत राबविण्यासाठी एकूण रु.६७.०० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास संदर्भाधीन पत्र क्र.१ अन्वये मंजुरी देवून संदर्भाधिन पत्र क्र. २ अन्वये पहिला हप्ता वितरित

केलेला आहे. सदर निधी संदर्भाधिन क्र.३ वरील शासन निर्णयान्वये आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक यांना वितरित करण्यात आलेला आहे.

३ EduisFun ही कंपनी २७ मार्च २०१५ रोजी स्थापन झाली असून, तंत्रज्ञानाच्या मदतीने शिक्षण आनंदी ,सोपे विद्यार्थ्यांना अवगत व स्वीकृत होईल या बाबत कामकाज करते. या बाबत सदर कंपनीने मुख्यत्वे गणित व विज्ञान संबंधी विविध गेम तयार केले आहेत. या गेमच्या मदतीने विद्यार्थी विज्ञान व गणित यांची तयारी करून विविध स्पर्धा परीक्षांमध्ये यशस्वी होऊ शकतील तसेच खेळी-मेळीच्या वातावरण तयार करून गुणवत्तापुर्वक शिक्षण देणे हा या कंपनी चा उद्देश आहे. सदर कंपनीद्वारे विविध ५३ देशांमध्ये सुमारे ५०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना ही सुविधा पुरवली जाते. या संस्थेचे संस्थापक मंडळाला २०१६ मध्ये All India Achievers Foundation मार्फत दिला जाणारा Indian Leadership Award मिळाला आहे. तसेच Global Entrepreneurship Summit २०१७ मध्ये भाग घेन्यासाठी निमंत्रित केले होते. सदर कंपनी IIT बॉम्बे ला "project khel" बाबत सल्लागार म्हणून काम करते. तसेच कंपनीने VAGAD Pace Global School, KU संघटन असोसिएशन-पवई ,कुलाबा , मानखुर्द व DPS गाझियाबाद यां समवेत कामकाज केले आहे. अशा नावाजलेल्या व या क्षेत्रामध्ये कामाचा अनुभव असलेल्या Eduisfun संस्थेमार्फत “Gamified Learning Labs In Eklavya Schools (training support & tablets for students; content under CSR)” ही योजना राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

आदिवासी विकास विभागामार्फत सुरु असलेल्या १४ एकलव्य मॉडेल शाळांमध्ये विविध तंत्रज्ञानाचा वापर करून विद्यार्थ्यांच्या बौद्धिक क्षमतेमध्ये वाढ करणे व शिक्षणाविषयी आनंदी सर्वसमावेशक वातावरण तयार करून देण्याच्या कार्यक्रमार्तंगत “Gamified Learning Labs In Eklavya Schools (training support & tablets for students; content under CSR) ही योजना EduisFun व आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत संयुक्तपणे राबविण्यासाठी एकुण रु ८६.३२ लाख किंमतीच्या अंमलबजावणीच्या मार्गदर्शक सूचनांना या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्ट क्रमांक- १ नुसार मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर योजनेचे या मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही आयुक्त आदिवासी विकास नाशिक यांनी करावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३.  हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१५०५५१७९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh R Rajput

Digitally signed by Ajitsingh R Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TDD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a614ce75be611413980d3efebe7cde81ad571ab119e8360b7b526b5159edd099, serialNumber=32168d31c7d800af039db3657f6a01d233033f3f7c16b7ca135b2c868025eb3e, cn=Ajitsingh R Rajput
Date: 2018.10.10 15:08:17 +05'30'

**( अ.रा.राजपूत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक.
५. आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे.
६. सहसचिव/ उपसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे,अमरावती, नागपूर व नाशिक.
८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
९. EduisFun कंपनी,मुंबई
१०. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
११. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.

**विशेष केंद्रीय सहाय्य योजना - सन २०१८-१९**

**परिशिष्ट-१**

| | | |
|---|---|---|
| १ | **योजनेचे नाव** | Gamified Learning Labs in (EMRS) Eklavya Model Residential School (training support and tablets for students - content under CSR) |
| २ | **वित्तीय तरतूद** | २०१८-१९ करिता विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत मंजूर निधी **रु ६७.०० लक्ष.**<br>महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी नाशिक **रु १९.३२ लक्ष**<br>एकून खर्च- **रु ८६.३२ लक्ष** |
| ३ | **योजनेचे लाभार्थी** | राज्यातील १४ EMRS . इ. ६ वी ते १२ वी चे विद्यार्थी |
| ४ | **योजनेचे प्रस्तावित कार्यक्षेत्र** | राज्यातील विविध प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेल्या १४ EMRS ( पेठ रोड- नाशिक,कांबळगाव, पिंपरी सद्दोदिन,नंदुरबार ,अजमेर सौदाने ,मवेशी,पिंपळनेर , शेंडेगाव,चिखलदरा,खैरी परसोडा ,बोरगाव ,तुमरगुंडा,सहस्त्रकुंड, देवाडा ) |
| ५ | **योजना राबविणारी यंत्रणा** | संबंधित प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प , महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी आणि EduisFun कंपनी. |
| ६ | **नियंत्रण अधिकारी** | आयुक्त अदिवासी विकास |
| ७ | **योजनेचा उद्देश** | १) EMRS मधील विद्यार्थ्यांना आनंददायी , सोपे व सर्व समावेशक शैक्षणिक वातावरण उपलब्ध करून देणे .<br>२ )विद्यार्थ्यामध्ये गणित व विज्ञान सारख्या कठीण विषयामध्ये हसत खेळत गोडी निर्माण करणे<br>३ )तणाव रहित शैक्षणिक वातावरण उपलब्ध करणे<br>४) विद्यार्थ्यांना स्वपरिक्षणाची संधी उपलब्ध करून देणे<br>५) EMRS मधील विद्यार्थ्यांना ऑलम्पियाड सारख्या विविध परीक्षांसाठी सहजरीत्या तयार करणे<br>वरील सर्व बाबीसाठी उत्तम तंत्रज्ञान, उत्कृष्ठ मार्गदर्शन याची इंटरनेट च्या माध्यमातून उपलब्धता करून देणे जेणेकरून विध्यार्थाना विषय समाजने सोपे होईल व कठीण विषय विध्यार्थाना सहज समजतील व त्या द्वारे EMRS मधील विद्यार्थी इतर विद्यार्थ्यांशी स्पर्धा परीक्षांमध्ये स्पर्धा करू शकतील . |

| | | |
|---|---|---|
| ८ | खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | **एकूण खर्च रु.८६.३२ लक्ष**<br>**विशेष केंद्रीय सहय्य योजने अंतर्गत करण्यात येणारा एकून खर्च -६७ .०० लक्ष**<br>**महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी मार्फत करण्यात येणारा एकूण खर्च - १९.३२ लक्ष**<br>१) विशेष केंद्रीय सहय्य योजने अंतर्गत करण्यात येणारया खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक पुढील प्रमाणे- |

| अ क्र | बाब | विवरण | खर्च |
|---|---|---|---|
| १ | software , dashboard व इतर समाविष्ट बाबी | गेमिफाईड शैक्षणिक प्रयोगशाळ निर्मिती,ड्युंअल कंटेंट चा इयत्ता ६ ते १० साठी प्रत्येक विद्यार्थ्यासाठी (परवाना,प्रशिक्षण कार्यशाळा,Log in Renewal ) तसेच ११ व १२ च्या विद्यार्थ्याला संदर्भसाहित्य व चलचित्र व्याख्यान (Study Material Video Lecture) उपलब्ध करून देतील | रु. १००० प्रती विद्यार्थ्याप्रमाणे ३२०० विद्यार्थ्यांसाठी रु. ३२.०० लक्ष |
| २ | प्रयोगशाळा निर्मिती व तत्सम खर्च | A) प्रती EMRS ५० tab ( प्रती tab रु. ५००० प्रमाणे प्रती EMRS ५० tab =२,५०,०००/-) ज्यामध्ये खालील वैशिष्टे असतील<br>१) Operating system-ANDROID ४.०<br>२) RAM १ GB Storage ८ GB<br>३) PROCESSOR -DUAL CORE १.६ GHz or Higher<br>४ प्रत्येक EMRS साठी ५० गेमीफीड शैक्षणिक कीट्स तसेच MANUALचा वर्ग ६ ते १० वी करिता १ संच आणि वर्ग ११ व १२ करिता १ संच | प्रती EMRS रु २.५० लक्ष प्रमाणे १४ EMRS साठी रु ३५.०० लक्ष |
| | | **एकून** | **६७.०० लक्ष** |

२) महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी मार्फत करण्यात येणारा प्रशिक्षण व इतर बाबी यांवर होणारा खर्च -

| अं.क्र | बाब | विवरण | प्रती EMRS वर येणारा एकूण खर्च | १४ EMRS साठी एकूण खर्च |
|---|---|---|---|---|
| १ | मुलभूत प्रशिक्षण | ३ दिवसाचे प्रशिक्षण (३ प्रशिक्षण तज्ञ प्रती दिवस ३००० रुपये मानधन प्रती तज्ञ) एका दिवसाचे (३* ३०००) एकूण ९००० रुपये याप्रमाणे | रू.२७,०००/- ( ३ दिवस प्रती रुपये रू.९०००/- या प्रमाणे ) | रू.३,७८,०००/- (रू.२७,०००*१४) |
| २ | Eduisfun च्या तज्ञांच्या मार्फत प्रती १५ दिवसातून एकद भेट व मार्गदर्शन | प्रती भेट (२ तज्ञ प्रती दिवस प्रती तज्ञ रू. ३००० मानधन) एकूण रू. ६०००/- | रू.७२,०००/- (एकूण १२ भेटी व प्रति भेट रू.६०००) (कमीत कमी ८ भेटी करणे आवश्यक गरज भासल्यास उर्वरित ४ भेटी करण्यात याव्यात) | रू. १०,०८,०००/- (रू.७२,०००*१४) |
| ३ | प्रशिक्षण तज्ञ यांचा प्रवास खर्च (अंदाजे( | प्रती प्रशिक्षण रू. ३००० -/या प्रमाणे | रू.३९,०००/- ( एकूण १३ प्रशिक्षणे ) | रू.५,४६,०००/- (रू.३९,०००*१४) |
| | | **एकूण खर्च** | १,३८,०००/- | १९,३२,०००/- |

**महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी कडे उपलब्ध असलेल्या निधीतून प्रशिक्षण व इतर बाबी यांवर होणारा खर्च करण्यात येईल.**

( प्रशिक्षण तज्ञ यांचा प्रवास खर्च हा त्यांनी प्रवासाचे बिल सादर केल्या नंतर अदा करण्यात येईल . सदर प्रवास हा ३ AC स्वरूपाचा रेल्वेचा व निमआराम बस या स्वरुपात राहील )

| | | |
|---|---|---|
| ९ | **योजना अंमलबजावणी कार्यापद्धती** | १) संस्थेला कार्यादेश मिळाल्यानंतर सात दिवसाचे आत योजना राबविण्यासंबंधी संस्था प्रत्येक शाळेला भेट देऊन संबंधित प्रकल्प अधिकारी व मुख्याध्यापक यांच्या बरोबर चर्चा करून योजना राबविण्याचे नियोजन करील.<br>२) त्यानंतर नियोजित ठिकाणी dual login प्रशिक्षण प्रयोगशाळेची स्थापना कामाचा आदेश मिळाल्यापासून १ महिन्याच्या आत करतील.<br>३) विद्यार्थ्यांसाठी करण्यात येणाऱ्या लॉगीन चा कालावधी हा मार्च २०२० पर्यंत EduisFun मार्फत उपलब्ध करून दिला जाईल. त्या नंतर लॉगीन चा कालावधी वाढविण्य संदर्भात निर्णय नियंत्रण व अंमल बजावणी समितीच्या अभिप्रायानुसारच घेतला जाईल . |

| | | |
|---|---|---|
| | | ४)प्रयोगशाळेची निर्मिती होत असताना संस्थेकडून प्रगती अहवाल संबंधित प्रकल्प अधिकारी यांना वेळोवेळी अवगत करून देण्यात येईल.<br>५)योजने संदर्भात सर्व पायाभूत सुविधा निर्माण झाल्यावर शिक्षकाना संस्थेद्वारे पायाभूत प्रशिक्षण देण्यात येईल<br>६) त्यानंतर शिक्षकांची कार्यशाळा आयोजित करून ह्या उपक्रमा सबंधाने संस्थेमार्फत शिक्षकांना विस्तृत प्रशिक्षण देण्यात येईल<br>७) सदर योजना कार्यरत असताना वेळोवेळी येणाऱ्या तांत्रिक अडचणी सोडविण्याची जबाबदारी संस्थेची राहील .<br>८) योजना पूर्ण होताच उपयोगिता प्रमाण पत्र सादर करणे सबंधित अंमल बजावणी यंत्रणेस बंधनकारक राहील.<br>९) प्रयोग शाळे करिता तसेच प्रशिक्षणासाठी आवश्यक ती जागा, साठवण करण्यासाठी साहित्य व इतर आवश्यक मदत करण्याची जबाबदारी सबंधित मुख्याध्यापक यांची राहील .<br>१०) प्रशिक्षणासाठी Eduisfun मार्फत येणाऱ्या तज्ञ प्रशिक्षकाचा प्रवास खर्च , राहण्याची सोय व मानधन या वरील खर्च करण्याची जबाबदारी महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी यांची राहील .<br>११) एकलव्य आश्रम शाळेमध्ये इंटरनेट ची सुविधा पुरविण्याची जबाबदारी सबंधित शाळेचे मुख्याध्यापक यांची राहील.<br>१२) प्रशिक्षण स्थळ तसेच प्रयोगशाळा या ठिकाणी विजेची सुविधा व इतर मुलभूत सुविधा आहे कि नाही या बाबत सबंधित शाळेचा मुख्याध्यापक खात्री करून घेईल.<br>१३) सदर प्रशिक्षणात गणित व विज्ञान विषयाचे शिक्षक सहभागी झाले आहेत कि नाहीत या बाबत सबंधित मुख्याध्यापक खात्री करून घेतील . |
| | **योजनेचा कालावधी** | शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १ वर्ष |
| १० | **सनियंत्रण , अंमल बजावणी व मूल्यमापन** | योजनेचे संनियंत्रण व अंमलबजावणी करीता पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे .<br>१) आयुक्त आदिवासी विकास विभाग - अध्यक्ष<br>२) संबंधित अपर आयुक्त आदिवासी विकास - सदस्य<br>३) संबंधित प्रकल्प अधिकारी - सदस्य<br>४) सबंधित एकलव्य शाळेचे मुख्याध्यापक - सदस्य<br>५) EduisFun कंपनीचा प्रतिनिधी - सदस्य<br>६) त्रयस्थ संस्थेची प्रतिनिधी - सदस्य<br>(सदर क्षेत्रात तांत्रिक ज्ञान असलेला व्यक्ती)<br>➢ सदर योजनेच्या अंमलबजावणी प्रक्रीयेमध्ये काही बदल किंवा सुधारणा करण्याचे अधिकार उपरोक्त समितीस राहतील. |

| | | |
|---|---|---|
| | | ➢ योजनेची अंमलबजावणी सुरू झाल्यापासून उपरोक्त समितीची बैठक दर २ महीन्यांनी आयोजित करावी व सदर बैठकीमध्ये योजनेच्या प्रगतीचा आढावा घेण्यात याव तसेच योजना अंमबलजावणीमध्ये काही अडचणी असतील तर त्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.<br>➢ सदर योजनेची अंमलबजावणी करताना चलचित्र (video) व छायाचित्रे काढावीत व योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी आयुक्त आदिवासी विकास विभाग यांची राहील .<br>➢ योजनेचे मूल्यमापन आवश्यकता तपासून त्रयस्थ संस्थेमार्फत करण्यात येईल . |
| ११. | **योजनेच्या अटी व शर्ती** | १) योजनेमध्ये बदल करणे, लक्षांकात बदल करणे ह्या संबंधी अधिकार आयुक्त आदिवासी विकास यांना राहतील.<br>२) योजना राबविण्या पूर्वी आयुक्त आदिवासी विकास यांच्या कडे अटी व शर्ती संबंधी करारनामा करून देणे बंधनकारक राहील.<br>३) EMRS च्या शाळामधील सर्व विज्ञान व गणित शिक्षक तसेच प्रयोगशाळा सहायक यांना प्रशिक्षण देण्याची जबाबदारी तसेच त्यांना वेळोवेळी मार्गदर्शन करण्याची जबाबदारी Enduisfun संस्थेची राहील .<br>४) शाळेमध्ये संस्थेमार्फत देण्यात येणारे Tabs हे देण्यापूर्वी एंप्लिकेशन ने अपलोडेड केलेले असावे.<br>५) Tabs मध्ये अपलोडेड केलेल्या विज्ञान व गणित विषयासबंधी असलेल्या गेम्स ह्या ऑफ लाईन मोडमध्ये सुद्धा वापरता येणे सबंधित संस्थेस बंधनकारक आहे .<br>६) Tab मध्ये असणारे साहित्य हे CBSE शिक्षणावर आधारित असावे .<br>७) योजना राबविण्यापूर्वी आयुक्त ,आदिवासी विकास,नाशिक यांच्याकडे अटी व शर्तीसंबंधी करारनामा करून घेणे संस्थेस बंधनकारक राहील.<br>८)योजना पूर्ण झाल्यानंतर योजनेचा फल निष्पती अहवाल आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांना तातडीने सादर करण्याची जबाबदारी संस्था व संबंधित प्रकल्प अधिकारी यांची असेल.<br>९) सदर प्रशिक्षण प्रयोग शाळेतील वेळोवेळी येणाऱ्या तांत्रिक अडचणी सोडविणे याची जबाबदारी संस्थेची राहील. |
| १२ | **निधी वितरणाची कार्यपद्धती** | ➢ सदर प्रकल्पासाठी मंजूर निधी महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी नाशिक यांच्याकडे आयुक्त कार्यालय आदिवासी विकास विभाग नाशिक यांच्या मार्फत वर्ग करण्यात येईल.<br>➢ प्रत्यक्ष काम सुरु झाल्या नंतर महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी EduisFun या संस्थेला प्रकल्प खर्चाच्या सुरवातीस प्रथम टप्यात ५० टक्के रक्कम अदा करतील.<br>➢ तद्नंतर प्रकल्पाच्या प्रगतीनुसार सनियंत्रण व अंमलबजावणी समितीच्या शिफारशी नुसार व सबंधित प्रकल्प अधिकारी यांच्या शिफारशी नुसार महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी पुढील टप्यात ३० टक्के रक्कम संस्थेला वर्ग करतील.<br>➢ प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर उरलेला २० टक्के निधी संस्थेला वर्ग केला जाईल. |

| | | |
|---|---|---|
| | | ➢ सदर प्रयोगशाळा उभारल्याकरिता येणारा प्राथमिक खर्च जसे कि अद्यावत साधन सामुग्री, व इतर खरेदी करिता येणारा संपूर्ण खर्चाचा अहवाल संस्थेने सबंधित प्रकल्प कार्यालयास सादर करावा .<br>➢ प्रशिक्षण बाबी व तज्ञ व्यक्ती यांच्या भेटी व मार्गदर्शन या संदर्भात करण्यात येणारा खर्च हा महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटी नाशिक यांच्या मार्फत केला जाईल .<br>➢ प्रशिक्षणा दरम्यान येणाऱ्या तज्ञ व्यक्ती यांचे मानधन व प्रवास खर्च हा सबंधित प्रकल्प अधिकारी यांच्या अभिप्राय व तज्ञ व्यक्ती यांच्या उपस्थिती नुसारच अदा करण्यात येईल. |
| १३ | **योजनेची फलनिष्पती** | ➢ एकलव्य शाळेच्या मुलांच्या बौद्धिक क्षमतेत वाढ होईल.<br>➢ विद्यार्थ्यांमध्ये शिक्षण संबंधी रुची तयार होईल.<br>➢ EMRS मधील विद्यार्थी ऑलम्पियाड सारख्या विविध परीक्षांसाठी तयार होतील. |